**ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन) नियम, २००० ची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी प्राधिकरणाची नियुक्ती करण्याबाबत तसेच शांतता झोन घोषित करणेबाबत**

महाराष्ट्र शासन
पर्यावरण विभाग, मंत्रालय,
शासन निर्णय क्रमांक : ध्वनीप्र-२००९/प्र.क्र.९५/तांक-१
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, मादाम कामा रोड, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ७ डिसेंबर, २००९

वाचा - १) शासन निर्णय क्रमांक:ध्वनीप्र-२००९/प्र.क्र.९५/तांक-१, दि. २१ एप्रिल, २००९
२) शासन निर्णय क्रमांक: ध्वनीप्र-२००९/प्र.क्र.९५/तांक-१,दि. ७ ऑगस्ट, २००९
३) मे. उच्च न्यायालयाच्या मुंबई खंडपीठामध्ये दाखल करण्यात आलेल्या सार्वजनिक हिताच्या याचिका क्र. (१) २०५३/२००३, (२) ७४/२००७, (३) ८५/२००७ आणि (४) १/२००९ मधील दिनांक २६/२/२००९ चे आदेश

<u>शासन निर्णय :-</u>

पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. एन.पी./२०००/२४/क्र.३, दिनांक २१/४/२००९ रोजी ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन) नियम, २००० च्या २ (क) नुसार, शांतता झोन जाहिर करण्यात आलेले आहेत. या शासन निर्णयाची व्याप्ती वाढविण्यासाठी सदर शासन निर्णयातील परिच्छेद १ मध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार तसेच ध्वनी प्रदूषण (नियंत्रण व नियमन) नियम, २००० च्या कलम ३ (५) नुसार महाराष्ट्रातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या कार्यक्षेत्रामध्ये व ग्रामीण क्षेत्रामध्ये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी शांतता झोन त्वरीत जाहिर करावे. तसेच शांतता झोनचे फलक लावून आदेशाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी योग्य ती प्रसिद्धी करावी.

१) शैक्षणिक संस्थांच्या सभोवताली १०० मीटर क्षेत्र
२) सर्व न्यायालयाच्या सभोवतीली १०० मीटर क्षेत्र
३) रुग्णालयाच्या सभोवताली १०० मीटर क्षेत्र
४) धार्मिक स्थळांच्या सभोवती १०० मीटर क्षेत्र

२) उपरोक्त परिच्छेदामध्ये शांतता झोन मध्ये धार्मिक स्थळांच्या समावेश करण्यात आला असल्यामुळे उपरोक्त संदर्भ क्र २ येथील शासन निर्णय ध्वनीप्र-२००९/प्र.क्र.९५/तांक-१, दि. ७/८/२००९ या शासन निर्णयाद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे. या बदला व्यतिरिक्त दि. २१/४/२००९ मध्ये शासन निर्णया मध्ये कुठलाही बदल करण्यात आलेला नाही. हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र.२००९१२०७१८४७७०६००१ हा आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(ग.नि.वराडे)
संचालक (पर्यावरण)

प्रत माहितीसाठी :-
अतिरिक्त मुख्यसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय
प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग
प्रधान सचिव, नगर विकास विभाग (१), मंत्रालय
प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२), मंत्रालय
प्रधान सचिव, महसूल विभाग, मंत्रालय
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय,
प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय
सचिव , गृह विभाग (परिवहन),
सचिव, पर्यावरण
मा. मंत्री (पर्यावरण), यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (पर्यावरण), यांचे खाजगी सचिव,
सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व पोलीस आयुक्त / उप आयुक्त
सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक / उप अधिक्षक
सर्व स्थानिक स्वराज्य संस्था
सर्व महानगर पालिका/नगर पालिका
पर्यावरण विभाग सर्व अधिकारी / कार्यासन /निवडनस्ती - तांक १

-------